**मा.उच्च न्यायालय,मुंबई व त्यांची खंडपीठे येथे दाखल झालेल्या प्रकरणात राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेल्या विधिज्ञांचे व्यावसायिक शुल्क अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-अर्थसं०६१८/प्र.क्र.६०/१३-स**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग ,
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक : ६ फेब्रुवारी, २०१९.

वाचा:-

१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,पुणे यांचे पत्र क्र.रासनिप्रा/निवडणूक/लेखा/कक्ष-१५/ पावसाळी पुरवणी मागणी/३९३४/२०१८ दि.३१.५.२०१८
२) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे परिपत्रक क्र.पूरक २०१८/प्र.क्र.७७/अर्थसंकल्प-३ दि.२५.५.२०१८
३) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्र.पूरक २०१८/( ३४/२०१८)/१७-स, दि.२९.५.२०१८
४) वित्त विभाग मंत्रालय यांचे परिपत्रक क्र.२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३ दि.२७/०७/२०१८
५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे शासन निर्णय क्र.अर्थसं०६१८/ प्र.क.६०/१३स दि.१५ /१०/२०१८ व शुद्धीपत्रक दि.३०/१०/२०१८
६) वित्त विभाग मंत्रालय यांचे परिपत्रक क्र.२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि.२५/०१/२०१९

प्रस्तावना :-

राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणुका राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणामार्फत घेण्यात येतात. सदर निवडणूकांच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय,मुंबई व खंडपीठ औरंगाबाद,नागपूर येथे प्राधिकरणाचे विरुध्द दाखल होणा-या याचिका दाखल केल्या जातात. तसेच महाराष्ट्र सहकारी संस्था ( समिती निवडणूक ) २०१४ चे नियम ७८ अन्वये दाखल होणा-या निवडणूक विवादासाठी प्राधिकरणाने नियुक्ती केलेल्या अधिवक्त्यांना शासकीय दराने अनुज्ञेय असलेले वकील शुल्क अदा करण्यासाठी रु.१५ लक्ष इतक्या रकमेची पुरवणी मागणी जुलै २०१८ पावसाळी अधिवेशनात मान्य झाली. त्यापैकी संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने रु.१०.५० लक्ष इतकी रकम वितरीत करण्यात आली होती.

उपरोक्त संदर्भाधिन क्र.६ येथील परिपत्रकान्वये ९० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने जुलै २०१८ च्या अधिवेशनात मंजूर पुरवणी-मागणीच्या ९० टक्केपैकी ७० टक्के निधी वितरीत करण्यास संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दर्शविण्यात आली होती. उर्वरित २० टक्के निधि वितरीत करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण ,पुणे यांच्या वतीने बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेले अधिवक्ता श्री.अभिजीत कापसे,श्री.शंतनू घाटे , श्री.मनोज पाटील , श्री.एस.के.कदम ,श्री.व्ही.एस.कदम,श्री.अमित बोरकर या अधिवक्त्यांना त्यांनी सादर केलेल्या देयकांच्या अनुषंगाने वकील शुल्क अदा करण्यासाठी मान्य झालेल्या पुरवणी मागणीच्या अनुषंगाने २० टक्के म्हणजेच रु.३,००,०००/- (रु. तीन लक्ष फक्त) इतका निधी या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

या शासननिर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला रु.३,००,०००/- (रु. तीन लक्ष फक्त) इतका निधी सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे या कार्यालयासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्यामार्फत वितरीत करण्यात यावी. यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांना नियंत्रित अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

वकीलांचे व्यावसायिक शुल्कासाठी येणारा खर्च "२०७० इतर प्रशासकीय सेवा,(००)(८००)- इतर खर्च, (०० )(०१),राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७००८८२)२८-व्यावसायिक सेवा "या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या पुरवणी मागणीच्या तरतुदीममधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग दोन अनुक्रमांक ४९ नियम क्र.१६६ अन्वये प्रशासकीय विभागांना असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे दि.२५ जानेवारी २०१९ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे. वितरीत झालेला निधीच्या खर्चाचा अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२०६१६५२१६६६०२ असा आहे.हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2019.02.06 16:53:55 +05'30'

(अनिल जयराम चौधरी)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
३) प्रधान सचिव,( सहकार ),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहायक
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ),महाराष्ट्र -१,मुंबई
५) अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई
६) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
७) अवर सचिव(१७-स) ,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
८) उपसचिव (व्यय-२) व (अर्थ -१३),मंत्रालय,मुंबई
९) निवडनस्ती.